**<u>अमरावती महानगरपालिका</u>**
**सर्वसाधारण सभा पारित ठराव क्र.३० दिनांक १९/०३/२०१६ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन,**
**नगरविकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-अमरावती-२०१६/प्र.क्र.६२/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०१ मार्च, २०१७

<u>वाचा</u> :- १) आयुक्त, अमरावती महानगरपालिका यांचे पत्र क्र.अमनपा/साप्रवि/आयु/३९२/१६, दिनांक ०७/०५/२०१६
२) शा.नि.समक्रमांक दि.१३/०७/२०१६
३) आयुक्त, अमरावती महानगरपालिका यांचे पत्र क्र.अमनपा/साप्रवि/आयु./१६३३/१६ दि.१९/७/२०१६
४) आयुक्त, अमरावती महानगरपालिका यांचे पत्र क्र.अमनपा/साप्रवि/आयु./३२८४/१६ दिनांक २२/१२/२०१६

**<u>प्रस्तावना</u> :-**

आयुक्त, अमरावती महानगरपालिका यांच्या संदर्भाधीन क्र.०१ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुलक्षून अमरावती महानगरपालिका, सर्वसाधारण सभा ठराव क्र.३० दिनांक १९/०३/२०१६ हा संदर्भाधीन क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये तात्पुरता निलंबित करण्यात आलेला आहे. या संदर्भाधीन क्र.०२. येथील शासन निर्णयात नमूद केल्यानुसार आयुक्त, महानगरपालिका अमरावती यांनी संदर्भाधीन क्र.०३ व क्र.०४ येथील पत्रान्वये त्यांचे अभिवेदन सादर केलेले आहे. तथापि, महापालिकेकडून कोणत्याही प्रकारचे अभिवेदन विहीत मुदतीत प्राप्त झालेले नाही.

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (३) मधील तरतुदीनुसार, "राज्य शासनास, महानगरपालिकेकडून किंवा आयुक्तांकडून किंवा परिवहन व्यवस्थापकाकडून मिळालेले कोणतेही अभिवेदन विचारात घेतल्यानंतर व तीस दिवसांच्या मुदतीत असे कोणतेही अभिवेदन मिळाले नसेल तर असा ठराव अंतिमत: विखंडीत करण्याचे अधिकार आहेत. त्यानुसार, अमरावती महानगरपालिकेच्या महासभेने पारित केलेला ठराव क्र.३० दि.१९/०३/२०१६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील प्रकरण अठ्ठावीस कलम ४५१ (३) नुसार अंतिमत: विखंडीत करण्यात यावा, असे आयुक्त, अमरावती महानगरपालिका यांनी संदर्भाधीन क्र.३ व ४ येथील संदर्भान्वये शासनाकडे पाठविलेल्या अभिवेदनाच्या आधारे अमरावती महानगरपालिका, महासभा ठराव क्र.३० दि.१९/०३/२०१६ हा अंतिमत: विखंडीत करण्याचा निर्णय घेण्याचा प्रस्ताव शासनस्तरावर विचाराधीन होता. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

अमरावती महानगरपालिका सर्वसाधारण सभेने पारित केलेले ठराव क्र. ३० दि.१९/०३/२०१६ महानगरपालिकेच्या आर्थिक व प्रशासकीय शिस्तीच्या विरोधात असल्याने, सदरचा ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ (३) नुसार अंतिमत: विखंडीत झाल्याचे मानण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०२१२३०५१९९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.03.02 12:32:27 +05'30'

**(ज.ना.पाटील)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.महापौर, अमरावती महानगरपालिका, अमरावती, द्वारा आयुक्त, अमरावती महानगरपालिका, अमरावती.
२) आयुक्त, अमरावती महानगरपालिका, अमरावती
३) सचिव (नवि-२) यांचे वि.का.अ.
४) उप सचिव (नवि-२६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६.